**शासकीय अधिकारी/कर्मचारी यांच्या भविष्य निर्वाह निधीचे लेख्यांबाबत महालेखापाल कार्यालयाकडून पुरविण्यात येणारी विवरणपत्रे ऑनलाईन पध्दतीने <u>काढून घेण्याबाबत.</u>**

# महाराष्ट्र शासन

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय, क्रमांकः भानिनि-२०१९/प्र.क्र.६१ /का.२४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ११ जून, २०२०

**<u>वाचा :-</u>** महालेखापाल कार्यालय,मुंबई यांचे पत्र क्र.PF Misc/Ch-1/Genl/ Int/K-६९५(II)१७४, दिनांक ७ फेब्रुवारी २०२०

**<u>प्रस्तावना :-</u>**

महाराष्ट्र शासनाच्या अ. ब व क गटातील अधिकारी व कर्मचारी यांच्या भविष्य निर्वाह निधीचे लेखे महालेखापाल कार्यालय, मुंबई व नागपूर येथे ठेवण्यात येतात. महालेखापाल कार्यालय नागपूर / मुंबई, यांना भविष्य निर्वाह निधी लेख्यांसाठी व विवरणपत्रांसाठी लागणाऱ्या पूर्वमुद्रित संगणक कागदांची मागणी त्या दोन्ही कार्यालयांकडून परस्पर केंद्रीय भंडारकडे नोंदविली जाते आणि सर्वसाधारणपणे केंद्रीय भंडारकडून महालेखापाल, नागपूर / मुंबई या कार्यालयाच्या लेझर कार्डचे देयक व विवरणपत्रांची देयके प्रदानासाठी सामान्य प्रशासन विभागाकडे प्राप्त होतात. त्याचा खर्च गेल्या अनेक वर्षापासून वित्त विभागाच्या सूचनेनुसार सामान्य प्रशासन विभागामार्फत भागविला जातो.यापूर्वी सदर देयके मंजुरीसाठी वित्त विभागाकडे पाठविण्यात येत होती, तथापि वित्त विभागाने त्याबाबतचे प्राधिकार सामान्य प्रशासन विभागास प्रदान केलेले आहेत.

२. प्रधान महालेखापाल कार्यालय, मुंबई यांनी दिनांक ७ फेब्रुवारी २०२० च्या पत्रान्वये सन २०१९-२०२० या वित्तीय वर्षापासून भविष्य निर्वाह निधीच्या तपशीलाचे लेखे कागदावर विवरणपत्र प्रिंट काढून पुरविण्यापेक्षा ऑनलाईन विवरणपत्रे प्रत्येक अधिकारी/कर्मचारी यांनी महालेखापाल कार्यालयाच्या वेबसाईटवरुन काढून घेतल्यास दरवर्षी कागद छपाईवर होणार खर्च कमी होऊ शकतो फक्त सेवनिवृत्त /मृत्यु होणा-या अधिकारी/कर्मचारी यांच्या भविष्य निर्वाह निधीचा अंतिम लेखे तपशील महालेखापाल कार्यालयामार्फत सर्व कार्यालयास पूर्वीच्या पध्दतीनुसारच कळविण्यात येईल असे कळविले आहे. त्यानुसार भविष्य निर्वाह निधीच्या तपशीलाचे लेखे विवरणपत्र प्रिंट काढून पुरविण्यापेक्षा प्रत्येक अधिकारी/कर्मचारी यांनी महालेखापाल कार्यालयाच्या वेबसाईटवरुन ऑनलाईन विवरणपत्र काढून घेण्यास व ते विवरणपत्र कोषागाराकडून ग्राहय धरण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

महालेखापाल कार्यालयाकडून सर्व अधिकारी/कर्मचारी यांना SMS व्दारे दरमहा भविष्य निर्वाह निधीची शिल्लक रक्कम मोबाईलवर कळविण्यात येते. त्यामुळे महाराष्ट्र शासनाच्या अ. ब व क गटातील अधिकारी व कर्मचारी यांच्या भविष्य निर्वाह निधीचे लेखे महालेखापाल कार्यालय, मुंबई व नागपूर कार्यालयाकडून प्रिंट काढून पुरविण्याची पध्दत **<u>सन २०१९-२० या वित्तीय वर्षापासून बंद करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे</u>**. महालेखापाल कार्यालयाच्या वेबसाईटवरुन संकेतस्थळ ( agmaha.cag.gov.in ) सर्व अधिकारी/ कर्मचारी यांना आपल्या भविष्य निर्वाह निधीच्या तपशीलाचे लेखे प्रिंट काढून घेता येतील.

१ महाराष्ट्र शासनाच्या अ. ब व क गटातील अधिकारी व कर्मचारी यांच्या भविष्य निर्वाह निधीची अंतिम प्रदानाची सेवानिवृत्त/मृत्यु प्रकरणातील विवरणपत्रे पूर्वीप्रमाणे महालेखापाल मुंबई/नागपूर कार्यालयाकडून पुरविण्यात येतील.

२ सर्व विभागप्रमुख/कार्यालयप्रमुख यांना कळविण्यात येते की, अधिकारी/कर्मचारी यांनी भविष्य निर्वाह निधीमधून अग्रिम/ ना परतावा रक्कमेची मागणी केल्यास ती मंजूर करताना सादर करण्यात आलेले विवरणपत्र लेखे अचूक असल्याची खातरजमा रोखशाखेकडून करुन घेऊन नंतरच मंजूरीचे आदेश निर्गमित करण्याची दक्षता घ्यावी.

३ अधिदान व लेखाधिकारी,मुंबई व सर्व जिल्हा कोषागार अधिकारी यांना कळविण्यात येते की, विभागांच्या/कार्यालयांच्या रोखशाखेमार्फत सादर करण्यात येणा-या देयकांसोबत अधिकारी/ कर्मचारी यांनी ऑनलाईन सादर केलेली भविष्य निर्वाह निधीच्या विवरणपत्रांची प्रिंट मुद्दा क्रमांक २ येथील बाबींची पूर्तता केल्यानंतर ग्राहय धरण्यात यावी.

४ हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५ सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००६१११४१९५९१६०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=c8b1e52c5c4f922ab6eb7a0b44101c838aea34f29fbff0aebe9d85c3de3468c2, ou=GENERAL ADMINISTRATION DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2020.06.11 16:03:06 +05'30'

( वि.रा.ठाकूर )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री / राज्यमंत्री, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
४) सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६) अपर मुख्य सचिव ( सेवा ) सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई

७) अपर मुख्य सचिव ( वित्त) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
८) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई /नागपूर
९) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर
१०) उप सचिव ( का.१३ अ) सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई
११) सर्व मंत्रालयीन विभाग ( त्यांना विनंती करण्यात येते की,त्यांनी सदर शासन निर्णय मंत्रालयातील सर्व अधिकारी/कर्मचारी यांच्या तसेच त्यांच्या नियंत्रणाखालील क्षेत्रिय कार्यालयातील सर्व अधिकारी/कर्मचारी यांच्या निदर्शनास आणावा.)
१२) सर्व विभागीय आयुक्त
१३) सर्व जिल्हाधिकारी
१४) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी ( जिल्हा परिषद)
१५) संचालक,नगर पालिका प्रशासन,वरळी,मुंबई
१६) संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई
१७) संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई
१८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२०) अवर सचिव (रोखशाखा ) मंत्रालय,मुंबई
२१) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
२२) निवड नस्ती (कार्यासन २४),सा.प्र.वि.मंत्रालय,मुंबई